अधू शासकीय कर्मचा–यांना कार्यालयाच्या वेळेमध्ये सवलत देणेबाबत...

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग मंत्रालय, मुंबई
शासन निर्णय क्र.एमआएस/1080/2/18, दिनांक 12 फेब्रुवारी 1980

शासन निर्णय

मुंबईतील शासकीय कार्यालयातील अधू कर्मचा–यांना कार्यालयाच्या वेळेमध्ये सवलत देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. सध्या मुंबइ तील सकाळच्या ऐन गदीच्या वेळी अधू व्यक्तींना कार्यालयात वेळेयर हजर होणे पुष्कळदा कठीण होते. शासनाने या समस्येचा सांगोपांग विचार करुन असा निर्णय घेतला आहे की, कायमचे अधूत्व असलेल्या शासकीय कर्मचा–यांना कार्यालयामध्ये येण्यासाठी सकाळी अर्धा तास सवलत देण्यात यावी ही सवलत फक्त मुंबईतील शासकीय कार्यालयापुरतीच मर्यादित ठेवण्यात यावी.

2 ही सवलत घेणा–या अधू कर्मचा–याने
अ–जे.जे. रुग्णालयाच्या अस्थिव्यंगोपचार शल्यचिकित्साकडून कमीत कमी कायमचे / औषिक अधूत्व असल्याचा दाखला त्यांच्या शिफारस पत्रासह व
ब – डोळयाने / नी अधू असलेल्या कर्मचा–यांनी जे. जे. रुग्णालयाच्या नेत्रचिकित्सक केंद्राकडून वरीलप्रमाणे दाखला व शिफारस पत्र आपल्या अर्जासोबत जोडावे.

3 अधू कर्मचा–यांना अशा त–हेची सवलत देण्याचे अधिकार विभाग प्रमुखांना देण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

प्र.रा. पेगम

अवर सचिव,
महाराष्ट्र शासन मुणे

GR- 200209191620450000-1500